# कुंपणावरून

[छायानाट्य]

श्रीधर बाळकृष्ण रानडे




★ ४९ ★

मूल्य सव्वा रुपया

'कुंपणावरून' या छायानाटकाचा प्रथम प्रयोग मुंबई मराठी साहित्य संघाच्या वार्षिक मराठी नाट्योत्सवांत सोमवार ता. २८-४-१९४७ रोजीं रात्रौ ९-४५ वाजतां करण्यांत आला.

पार्श्वसंगीतनियोजक : श्री. जी. एन्. जोशी,
व श्री. ए. पी. नारायणगांवकर

| | |
|---|---|
| गायक व गायिका | : श्री. ए. पी. नारायणगांवकर व कु. विजया देसाई |
| व्हायोलिन | : श्री. खराडकर |
| तबला | : श्री. कामूराव मंगेशकर |
| सूत्रधार | : श्री. माधव मनोहर |
| प्रकाशयोजना | : श्री. अच्युत थत्ते |
| ध्वनि | : श्री. बंडोपंत वैद्य |
| रंगभूमि व्यवस्था | : श्री. बाळ सामंत, श्री. श्रीकृष्ण पोवळे व श्री. राजे |

## पात्रें

| | छाया | ध्वनि |
|---|---|---|
| काजू | श्री. राजाभाऊ थत्ते | श्री. बा. रानडे |
| प्रदीप | श्री. मदनमोहन | श्री. बा. रानडे |
| डॉ. बिंदुमाधव | श्री. दिनकर साक्रीकर | श्री. मदनमोहन |
| पाकोळी | सौ. मालती मनोहर | कु. प्रेमा कामेरकर |
| नेत्रा | सौ. वसुधा थत्ते | सौ. विमल धैसास |

---



प्रकाशक : के. भि. ढवळे
श्रीसमर्थ-सदन : २
गिरगांव, मुंबई २

प्रथमावृत्ति
मे, १९४७

मुद्रक : बा. ग. ढवळे
कर्नाटक मुद्रणालय
गिरगांव, मुंबई २

# प्रस्ताव

नाटकाची आजवरची सांप्रदायिक परंपरा ज्यांच्या दृष्टीनें अधिकृत ठरलेली आहे, त्यांना प्रस्तुत नाट्यप्रकार कितपत पटेल याची शंका असूनही मी या प्रस्तावाला सुरुवात करीत आहें.

पहिल्यापासूनच मला नावीन्याचें वेड आहे. मराठी रंगभूमीवर नवे नवे नाट्यप्रकार सुरू करण्याचे सर्वच प्रयत्न आजवर जरी यशस्वी झाले नाहींत तरीही रंगभूमीवर नावीन्य आणण्याचा केलेला कोठलाही प्रयत्न मला उत्तेजक वाटतो आणि म्हणूनच या छोट्याशा पुस्तकाला प्रस्तावना लिहिण्याचें मीं मोठ्या आनंदानें पत्करलें.

प्रो. रानडे यांनीं शोधिलेला हा नवा नाट्यप्रकार पूर्णपणें नावीन्याचा द्योतक आहे. अशा प्रकारचें नाटक परदेशांत सुद्धा करून दाखविण्यांत येत असतें कीं काय याचा पुरावा मला तरी उपलब्ध झालेला नाहीं. भारतीय रंगभूमीवर जगद्विख्यात नर्तक उदयशंकर चौधुरी यांनीं छायानाट्याचे प्रयोग करून दाखविले होते, ते नुसते नर्तनात्मक होते. त्या नर्तनाला उठावणी देण्याकरितां आणि तालाकरितां पार्श्वसंगीताची योजना केलेली होती. त्या संगीताचा उपयोग भावनेच्या अनुरोधानें इष्ट तो परिणाम उत्पन्न करण्याकरितांही केला जात होता.

पण तें नाटक नव्हतें. त्यांत वाचेला स्थान नव्हतें. अभिनयाची जागा नृत्यानें घेतलेली होती. प्रस्तुत नाटकांत शब्द आणि अभिनय यांना रंगभूमीवरील नाटका-इतकेंच महत्त्व देण्यांत आलें आहे. शब्दाच्या उच्चारानें आणि भावनेला दिलेल्या हेलकाव्यांनीं तसेंच अंगविक्षेपानें होणाऱ्या किंवा चेहेऱ्यावर होणाऱ्या परिणामाचें प्रदर्शन प्रस्तुत प्रकारांत रंगभूमीइतकेंच, किंबहुना त्याहीपेक्षां जास्त कौशल्यानें दाखविलें जाणें अवश्य आहे.

रंगभूमीवर अवश्य असलेली पार्श्वभूमि अगदीं थोड्या प्रयासानें—पण ती योजना करण्यांत पूर्ण कौशल्याचा पुरावा देतां आला तरच—या प्रकारांत दाखविणें शक्य आहे. अतएव सर्व प्रकारें उघड्या रंगभूमीवर जे जे प्रयोग करणें शक्य आहे ते ते सर्व प्रयोग करून हें छायानाटक दाखवितां येणें शक्य आहे.

हा प्रकार सर्वस्वीं नवीन असल्यामुळें या नाटकाच्या तंत्राचा विस्तृत सिनेरिओ लिहिणें अवश्य होतें; पण या छोट्याशा पुस्तकांत तें शक्य नव्हतें. प्रत्यक्ष दिसून येणाऱ्या परिणामाला पोषक होतील इतक्या सूचना जरी या पुस्तकांत देण्यांत आल्या आहेत तरीही या प्रयोगाचें यथार्थ स्वरूप आकलन व्हायला त्या अपुऱ्या पडतील असें वाटतें.

हा प्रकार अगदींच नवीन आहे. हा नवा शोध आहे. हें अनुकरण नव्हे, किंवा विडंबनही नव्हे. भावनात्मकतेचें प्रदर्शन पूर्णत्वानें करण्याचें सामर्थ्य नाटकाइतकेंच याही प्रकारांत आहे. भावनेचें प्रदर्शन करण्यासाठीं रंगभूमीवर नटाचा चेहेरा चारी बाजूंनीं दिसण्याची जी सोय असते तिला या प्रकारांत मर्यादा पडल्यामुळें प्रकाशाच्या अनुरोधानें चेहेरा विशिष्ट कोनांत राखल्याशिवाय तें प्रदर्शन परिणामकारक स्वरूपांत होणार नाहीं. म्हणूनच रंगभूमीवर काम करणाऱ्या नटापेक्षां या छायानाटकांत काम करणाऱ्या छायानटावर जास्त जबाबदारी येऊन पडते. त्या दृष्टीनें रंगभूमीपेक्षां या प्रकारांत नटाला जास्त कौशल्य दाखविणें अवश्य होईल.

या नाट्यप्रकारांत आणखी एक विशेष सोय आहे. प्रत्यक्ष अभिनय करणाऱ्या नटाऐवजीं वाक्योच्चार करणारी व्यक्ति निराळी असली तरी ओठांच्या हालचालीचा शब्दाशीं मेळ घालण्याची योजना केली तर इष्ट तो परिणाम घडवून आणतां येईल. चेहेऱ्याची अनुकूलता असली तरी आवाजाची किंवा उच्चारकौशल्याची जोड नसल्यास कांहीं कांहीं नट कांहीं कांहीं भूमिकांना निरुपयोगी ठरतात. म्हणून चेहेरा एकाचा आणि शब्द दुसऱ्याचा अशी संयोजना करणें या नाट्यप्रकारांत शक्य असल्यामुळें, या बाबतींत तरी ही सोय चित्रपटाइतकीच उपयुक्त ठरणार आहे.

प्रस्तुत छायानाटकाचा प्रयोग करणें रंगभूमीवरील दृश्य नाटकापेक्षां जास्त बिकट आहे. म्हणूनच मला हा प्रकार विशेष आवडला. अभिनयकौशल्याचे जेवढे जेवढे नवे पैलू निर्माण करतां येतील, तेवढी तेवढी नाट्यकलेची प्रगति जास्त होईल. आजपर्यंत होणाऱ्या कित्येक छायानाटकांत मूकाभिनयानें काम भागवून नेतां येत होतें पण त्यामुळें अभिनयाला जितकें अपूर्णत्व येत होतें, तितकेंच भावनेच्या प्रदर्शनाला बंधन पडत होतें. पूर्वींचे मूक चित्रपट आणि आतांचे बोलपट यांच्या विकासाचा आणि परिणामकारकतेचा परस्पर संबंध ध्यानीं घेतला तर या नव्या नाट्यप्रकाराच्या अधिष्ठानाचें महत्त्व निश्चित करतां येईल.

प्रोफेसर रानडे हे एक कवि आहेत. तसेच एक जीवशास्त्रज्ञही आहेत आणि बालवाङ्मयाचे प्रवर्तकही आहेत. मुंबईच्या रेडियोवर मुलांसाठीं कार्यक्रम करतांना मराठी मुलांना 'तिंबूनाना' या संबोधनानें त्यांचा परिचय झाला होता. तिंबूनानांचे ते कार्यक्रम मुलांत फार लोकप्रिय झाले होते. सर्वसाधारण लोकप्रियतेचें गमक बालमनावर होणाऱ्या परिणामांतून निश्चित करतां येत असतें. श्राव्य नाटकाचा प्रयोग करतांना प्रोफेसर रानडे यांना जो अनुभव आला, त्यांतून या छायानाटकाच्या कल्पनेचा जन्म झाला असावा असा माझा अंदाज आहे. दृश्य नाटकापेक्षां श्राव्य नाटकाचें तंत्र जास्त बिकट आहे. दृश्य नाटकापेक्षां छायानाटकाचें तंत्र जास्त बिकट आहे. म्हणूनच या दोन्ही प्रकारांचा संयोग करून त्यांनीं या छायानाटकाची निर्मिती केली असावी.

कवि आणि नाटककार या भूमिका जरी भिन्न असल्या, तरी भावनेच्या रस-निर्मितीच्या दृष्टीनें या दोन्ही भूमिका पुष्कळशा एकमेकांना मिळत्या आहेत. कवि नुसता भावनेला जन्म देतो, तर नाटककार त्या भावनेच्या निष्पत्तींतून प्रत्यक्ष नवी सृष्टि निर्माण करून दाखवीत असतो. या दोन्ही भूमिकांचा संयोग प्रो. रानडे यांच्या ठिकाणीं झालेला आहे, हें प्रस्तुत नाटकावरून दिसून येईल.

काव्य हें रसानुकूल असलें तरी अभिनयानुकूल असतेंच असे नाहीं. अभिनयाची निष्पत्ति होण्यासाठीं त्या अभिनयासाठीं योजलेल्या वाक्यरचनेंत अभिनयानुकूलतेचें सामर्थ्य असावें लागतें. शब्दावडंबराच्या भाराखालीं अभिनय बहुधा चिरडला जातो. नुसत्या वाचनानें असलें शब्दावडंबर आकर्षक वाटलें तरी तें अभिनय-निष्पत्तीला पोषक होत नाहीं, तशीच केवळ साध्या सीध्या शब्दांचा उपयोग करून सोपी वाक्यरचना केली तरीही अभिनयनिष्पत्ति होत नाहीं. प्रो. रानडे यांच्या सोप्या भाषापद्धतींत अभिनयनिष्पत्तीचें जें सामर्थ्य आहे, तें आजकालच्या बऱ्याचशा नाटककारांच्या लेखनांत अभावानें जाणवतें. प्रस्तुत नाट्यप्रकार नवा असला तरी त्याच्यासाठीं अवश्य असलेलें लेखनकौशल्य दृश्य नाटकाला अनुकूल असलेल्या कौशल्याशीं तुल्यबल असेंच आहे आणि म्हणूनच प्रो. रानडे हे एक यशस्वी नाटककार आहेत हें या नाटकानें सिद्ध करून दाखविलें जाईल अशी माझी अपेक्षा आहे.

नावीन्य हें कितीही उद्बोधक असलें तरी तें लोकप्रिय होणें सुलभ नसतें. प्रस्तुत नाट्यप्रकार हा सर्वस्वीं नवीन असल्यामुळें लोकप्रिय होण्यास बराच

अवधि लागेल असें मला वाटतें. रंगभूमीच्या परंपरेंतील नट – चित्रपटाचे बाबतींत अनुभव आल्याप्रमाणें – या कामींही सर्वस्वीं उपयुक्त ठरतील असें मला वाटत नाहीं. या विशिष्ट प्रकारच्या अभिनयकौशल्यासाठीं नव्या नटनटींची निर्मिती करावी लागेल. पार्श्वभूमीच्या प्रदर्शनाचे जसे नवे प्रयोग करावे लागतील तसेच नव्या प्रकारचें पार्श्वसंगीतही निर्माण करावें लागेल. प्रकाशाच्या योजनेचे देखील असेच नवे नवे प्रयोग करून छायानाटकाचें एक नवेंच तंत्र अस्तित्वांत आणावें लागेल. रंगभूमि आणि चित्रपट यांच्याप्रमाणेंच श्राव्य नाटकाच्या शाब्दिक तंत्रावर आधारूनच छायानाटकाचा प्रयोग करतां येणार नाहीं. हा नवा शोध आहे हें पुन्हा एकदा सांगणें अवश्य आहे. नव्या शोधाला अवश्य असलेलें नवें तंत्र ज्या वेळीं पूर्णत्वाला येईल त्याच वेळीं हा नवा नाट्यप्रकार खऱ्या परिणामकारक स्वरूपांत प्रदर्शित करणें शक्य होईल. तसें नवें तंत्र निर्माण करण्याचें सामर्थ्य प्रो. रानडे यांच्या ठायीं आहे. मात्र त्याला अवश्य असलेल्या साधनांची अनुकूलता कोणीं तरी करून दिली पाहिजे. तसें होणें शक्य झालें तर नाट्यप्रकार परिणामक्षम करून दाखविण्याचें सामर्थ्य या नाटककाराच्या अंगीं आहे याची मला पूर्ण जाणीव आहे. हा प्रयोग यशस्वी झाला तर खेड्यापाड्यांतून प्रचार करण्याच्या दृष्टीनें तो चांगलाच उपयुक्त ठरेल. सामान्य जनतेप्रमाणेंच आमच्या सरकारनें सुद्धा या कामीं सहाय्य केलें तर प्रचाराचें हें नवें साधन प्रभावी ठरून एका नव्या कलेला जन्म दिल्याचें श्रेय सर्वांना मिळेल. तसें झालेलें प्रत्यक्ष पाहावें अशी माझी इच्छा आहे.

हाजीकासम वाडी, मुंबई
२१ एप्रिल, १९४७

मामा वरेरकर

## झोत १

[ पडद्यावर पहाटेची वेळ दाखविणारें चित्र दिसते.
चित्र नाहींसें होऊन प्रकाश तेजस्वी होत असतां ]

**सूत्रधार :** [ माईकसमोर बोलतो ]

" बघ आंतून, बाहेरुन, भंवतीं, वर, खालीं
हा निवळ तमाशा सारा मायाजालीं
अन् आपण छायाऽऽकृति ज्या येतीजाती
आकाशदिव्यामधिं रविज्योती भंवतालीं "

द्राक्षकन्या – माधव जूलियन् —

आपण सर्वजण अशा मायेच्या सावल्या आहोंत आणि अशा सावल्यांच्या बोलत्या सावल्या आपल्यासमोर पडद्यावर छायानाटक दाखविणार आहेत. जगाच्या आरंभापासून आतांपर्यंत मानवांच्या उत्सुक सावल्या एकाच ध्येय-दिव्याभोंवतीं भ्रमत आहेत. आसुसलेलें प्रेम, उत्कट मंचरी वृत्ति, बहकलेले तरुण, तरुणींची निष्ठा आणि अखेर प्रेमाचा विजय, या एकाच तऱ्हेच्या विषयावर अनेक महाकाव्यें व नाटकें रचलीं आहेत. आज अशीच एक कथा या बोलत्या सावल्या आपणांस सांगणार आहेत.

हा पाहा आपला नायक ! वाट चुकून रात्रभर चालून दमलेला, बुटका, कुरूप, तरुण, जड पिशवी कशीबशी उचलीत येतो आहे. काय म्हणालांत !

सांगतों ! याचें नांव श्रीयुत खद्योत ऊर्फ काजवा ! पण या भोळसर प्राण्याला सर्व जग ' काजू ' या सुटसुटीत नांवानेंच ओळखतें ! कुणाचें तरी घर शोधतो आहे वाटतें ! पाहा. दूरवर पाहून, चार पावलें चालून, थबकून, मागे वळून, रस्त्याच्या मधोमधच आपली बॅग ठेवून, त्यावरच स्वारी मटकन् बसली ; कपाळा-वरचा घाम पुशीत ही स्वारी आपल्याशींच काय पुटपुटते आहे बरें ?

**काजू :** बेट्या काजू ! तुला घर सापडेलच कसे ? या उभ्या आयुष्यांत कोणत्या गोष्टींत तुला यश मिळालें आहे ? नुस्ता ढिसाळ, अपयशी, दळभद्री आहेस तूं ! कॉलेजांत सगळ्यांनीं बनवला ! मामा होतास मामा ! वर कॉलेजांतून हाकून दिलें तें निराळेंच ! होय होय ! प्रेम केलें, कविता लिहिल्या ; इंग्रजी, संस्कृत, मराठी नाटकें, कादंबऱ्या, काव्यें वाचली ! होय रे ! कालिदास, शेक्सपियर, शेले अन् शॉ जिभेवर नाचले ! मोठा स्कॉलर होतों, पण काय उपयोग ?

लाजाळू आणि भिडस्त स्वभाव आणि हें असें रूप ! काय हात, काय तोंड आणि काय नाक ! अस्से वाटतें कीं नाक उपटून स्वतःच्याच दोन मुस्कटांत भडकावून घ्याव्या !

माझ्याच वांट्याला असें रूप कां ? तरल कल्पना, उच्च विचारसरणी, उदात्त भावना आणि निष्कपट स्वभाव यांची कुणीच का परीक्षा करूं नये ? स्वप्नसुंदरीवर निष्फळ प्रेम करीत किती दिवस राहूं ?

माझ्याकडे पाहून लोकांनीं चेष्टा करावी, तरुणींनी हसावें, सगळ्यांनीं तिरस्कार करावा. कुणालाच मी नको आहें. हॅम्लेटप्रमाणें मी निष्क्रिय, निर्जीव यंत्र आहें. साधी गोष्ट मला करतां येत नाहीं. रात्रभर भटकतों आहें, पण डॉक्टर बिंदुमाधवांचें घर मला सापडत नाहीं. ग्रंथीवरील शास्त्रीय प्रयोगांत मदत करण्यासाठीं त्यांनीं मला बोलावलें. हें घर सापडलें नाहीं तर माझ्या जीविताचा ग्रंथच आटोपला !

**सूत्रधार :** याच वेळेला भल्या पहांटेस मोत्याला सोबत घेऊन फिरायला गेलेले डॉक्टर बिंदुमाधव परत आले, हें काजूचें सुदैवच म्हणायचें. डॉक्टर बिंदुमाधव नामांकित विद्वान् पण गर्विष्ठ, तुसडे आणि माणूसघाणे ! आपल्या घराच्या पायरी-जवळच हें बुजगावणें ध्यान पाहून ते गरजले यांत नवल नाहीं.

**डॉक्टर बिंदुमाधव :** क्यौ बे ! मवाली ! साला काय करतो येथे ? कशाला येथें बसलास ? ही काय चौपाटी बाग आहे ? का ट्रॅमनाका आहे ? चलो यहांसे ! मोत्या छूः ! पकड तंगडी गद्धयाची !

**काजू :** कोण ? तुम्हीच का ? बिंदुकाका ! देव पावला ! मी तुमचेंच घर शोधतों आहें ! मी काजू...म्हणजे......काजवा...खद्योत ! ओळखलेंत नाहीं मला ? अहो, तुम्हींच मला पत्र पाठवून बोलावलेंत ! तुमचा मदतनीस म्हणून, शास्त्रीय शोधांत मदत करायला ! व्हिटामिन, हार्मोनियम...कां हर्मोन आणि ग्रंथिरस यांवर ! – डॉक्टरकाका, तुम्ही सुद्धा मला ओळख देत नाहीं ? तुम्हाला सुद्धा मी आवडत नाहीं का ? अरे देवा ! !

**डॉक्टर बिंदुमाधव :** आस्ते, बेटा आस्ते ! मन शांत ठेव. हृदयाचे ठोके वाढले तर पिच्यूटरी ग्रंथीचा प्रकोप होतो ! काय गमतीचा आहे तुझा चेहेरा ! खरेंच, तुला आणि प्रदीपला मी फार लहानपणीं पाहिलें होतें ! फार लहानपणीं या ग्रंथीचे परिणाम दिसत नाहींत ! छान ! छान ! ठेंगू, बुटका, आणि...हं हं ! अरे, मला कुणीं सांगितलें असतें तर अगोदरच तुला बोलावून घेतलें असतें ! योग्य शरीर आहे प्रयोग करून पाहायला ! आतां उंदीर, गिनिपिग, कोकरें कशाला ? – अँ ? तुला नाहीं कळायचें तें ! कुछ फिकीर नहीं ! चल माझ्याबरोबर. तुझे कष्ट संपले आतां. चल घरांत. चल पुढें ! अरे अरे ! तिकडे नाहीं ! त्या कुंपणापलीकडे नाहीं. ते उर्मट सोनोपंत मसालेवाले राहातात त्या बंगल्यांत. आतां म्हणे शेळ्या-कोंबड्यांची जोपासना करतात. काय ती त्यांची उर्मट नेत्रा आणि तिचीच जुळी बहीण, ती फटाकडी, नटवी पाकोळी...बटरफ्लाय ! एक दिवस दिव्यावर होरपळशील म्हणावें. छ्यः पाकोळी ! शीः !

**काजू :** पाकोळी ? नेत्राची जुळी बहीण ? सोनोपंत मसालेवाल्यांची पाकोळी ? पाकोळी, माझी पाकोळी ? " जुगनू मै तूं तितली हो – मी काजवा, तूं पाकोळी ! " इतक्या दिवसांच्या विरहानंतर – हालअपेष्टांनंतर – पुन्हा इतक्या जवळ – कुंपणा-पलीकडे ? केशवसुता ! खरें आहे—

ज्ञाताच्या कुंपणावरून – उड्डाण करून – चित्घन चपला जी जाते....
हुं हुं हूं हुं हुं हूं....त्या गीतींचे ध्वनि उठती – झपूर्झा गडे झपूर्झा !

**डॉक्टर बिंदुमाधव :** मूर्खा! असा काय पुटपुटतोस क्षीणग्रंथि मोरॉनप्रमाणें! मला नाहीं आवडत तुझं झपूर्झा! माझ्या कर्णनसांचा दाह होतो. चूप! शीळ नको घालूं! चल माझ्या मागोमाग! चल रे मोत्या!

[ डॉक्टर बिंदुमाधव जातात. ]

[ काजू आपली टोपी उचलून फेंकून डोक्यावर वाकडी तिकडी बसवतो. बॅग उचलून तिला झोके देत वाकडा तिकडा नाचत मागून जातो. आपली प्रिया पाकोळी भेटणार या आनंदांत आहे बेटा! ]

[ हळुहळू अंधार ]

# झोत २

[ दोन बागांतील कुंपण. हळुहळू प्रकाश तेजस्वी होतो. ]

**सूत्रधार :** प्रयोगशाळेंत अनेक दिवस किचकट कंटाळवाणें काम करून थकलेला काजू बागेंतल्या स्वच्छ हवेंत हातपाय मोकळे करायला आला आहे. सोनोपंत मसालेवाल्यांच्या आणि डॉक्टर बिंदुमाधवांच्या मागच्या बागांच्या मध्यें हें लहानसें कुंपण आहे. हा पाहा काजू! आळोखे पिळोखे, जांभया देतां देतां मध्येंच थबकला! आ वासलेला तसाच राहिला आहे! कुंपणापलीकडे कोकराला गोंजारीत कोण बसली आहे ती? काजूला वाटलें, आपली पाकोळी रे पाकोळी! डोक्याचे विसकटलेले केस चोपून बसवून, काजूनें, पाहा, कुंपणापलीकडे एक फूल फेकलें. जरासें खाकरून "पाकोळी! पाकोळी!" अशी हाक मारली आणि कुंपणावरून डोकावलें!

अरेच्या! ही तर नेत्रा! हिरमुसला होऊन काजू मागें सरकला......पण नेत्रा? या आकस्मिक भेटीनें आनंदून, कोकरूं खालीं ठेवून हृदयाची धडधड थांबविण्याचा निष्फळ प्रयत्न करीत हात पसरून ती म्हणाली—

**नेत्रा :** काजू! काजू! कुठें होतां तुम्ही? मला कित्ती कित्ती आनंद झाला आहे! कसे आलांत तुम्ही इथें? मला मुद्दाम भेटायला आलांत होय? कवि खद्योत, सांगा पाहूं माझ्यावर आणखी किती कविता रचल्या आहेत त्या? मी ओळखलेंच तुम्हांला सुद्धा आनंद झाला आहे तें! तुझे डोळे काजव्यासारखे लुकलुक हसताहेत काजू! मी आतां कॉलेजांतली पोर राहिल्यें नाहीं काजू! ही कुमारी नेत्रा आतां

आंधळ्यांच्या दवाखान्यांतली सिस्टर आहे सिस्टर! ...काजू! एकदा तोंड भरून म्हण ना! 'तुलाच मी भेटायला आलों!' म्हण ना काजू!

**काजू :** Vanity! Thy name is woman! हं! [ वेडावीत ] "तुलाच मी भेटायला आलों आणि तुझ्यावरच कविता रचल्या!" खुळे पोरी! "स्वप्नसुंदरीवरी रचितसे मी माझीं कवनें!" समजलें?

मला आनंद झ्यालाय् आणि डोळे काजव्यासारखे लुकलुकताहेत काय? ...नेत्रा, मी तुझ्या जुळ्या बहिणीला—माझ्या पाकोळीला भेटायला आलों आहें! त्या—त्या दिवशीं कॉलेजांत माझी शोभा केलीस! विसरलों नाहीं मी! आणि—आणि त्युला भेटायला आलों! हॅं :

**नेत्रा :** काजू! काजू! खद्योतराव! असे निष्ठुर कसे झालांत तुम्ही? तुम्हांला कसें समजत नाहीं अजून? कां, कां त्या दिवशीं तुम्ही तसे वागलांत? सगळ्या लोकांच्या देखत! आंधळी, आडमुठी आहे सारी पुरुषजात! सान्या मुली—पाकोळी सुद्धा—तुमची चेष्टा करीत होत्या. तुम्ही आणि तुमच्या कविता मला आवडायच्या! हं! जाऊं दे! ठीक आहे! धावा पाकोळीमागे! पाहा ती तुमच्या चिमटींत सापडते का? तुमचे बंगले आणि वाडे, मोटारी अन् घोडे यांना ती भुलेल असे वाटतें होय तुम्हांला? ओळखलें नाहीं अजून तुम्ही सुंदर पाकोळीचें गिरगिरतें मन! घ्या एकदा अनुभव आणि पकडा पाहूं पाकोळीला!

पाकोळी, ए पाकोळी! ये बाई लवकर, उडत, उडत! हें कृष्णकमळ तुझ्यासाठी घाबरें झालें आहे! सुंदर पाकोळी; आम्ही चिमण्या भोरड्या! आम्हांला कोण पुसतो! हंः चला नेत्राबाई, तुमची जागा आंधळ्यांच्या खाटेजवळ! ...किती आंधळा आहेस रे काजू तूं!

लागले हे नेत्र माझे तुजकडे राया—

तुजकडे राया........ [ गुणगुणते ]

हूं! चला आपल्या वाटेनें.

[ नेत्रा जाते. ]

[ सुंदर तलम वस्त्र नेसलेली पाकोळी हातांत पाळलेला बहिरीससाणा घेऊन घाईघाईनें येते. ]

**पाकोळी :** नेत्रा ! नेत्रा ! अग, अशी जाऊं नकोस ! थांब ग ! माझा लाडका राजस राणा – बहिरीससाणा पाहा तर खरा ! कसा गोजिरवाणा आहे ! – अईग ऽऽऽ– ! मेल्या... ! चावलास बोटाला ! भूक लागली आहे ग याला, नेत्रा ! चावतोय् ! मांस पाहिजे होय कोवळं लुसलुशीत. तर ! तर ! कसलेंही मांस चालेल म्हणतोस ? काडी पैलवानाचें – जरत्कारूचें चालेल — ? अरे लबाडा ! इतकी भूक लागली होय बच्चाला ! काय म्हणतोस ? पेंढा भरलेलें, गाडगी डोक्याचें बुजगावणें सुद्धा चावून खाशील ! खादाड कुठला......! अय्या ! हें कोण आहे पलीकडे ? झुरळ, बुजगावणें का जरत्कारू ! ससाण्या, जेव पोटभर आतां !

[ काजू कुंपणाजवळ येतो आणि आनंदातिशयानें ओठाशीं जुळलेलीं बोटें लावून तिच्याकडे चुंबन फेकल्याचा आविर्भाव करतो. ]

**काजू :** पाकोळी ! पाकोळी ! माझी पाकोळी ! कशी मला विसरलीस तूं इतके दिवस ! " ... कुंपणावरून, उड्डाण करून ! चित् घन चपला ... हुं हुं हूं हुं हुं हूं ...झपूर्झा गडे झपूर्झा !

**पाकोळी :** [ चमकून मागें सरकून हेटाळणीच्या स्वरांत ] कोण ? काजू ? तूं ? इथें कुठें धडपडायला आलास ? जगांत दुसरीकडे कुठें जागा नव्हती का ? कुणाच्या ठोकरीनें आदळलास तूं इथें ?

**काजू :** किती थट्टेखोर आहेस ग तूं पाकोळी ! मी डॉक्टर बिंदुकाकांकडे राहायला आलों आहे आतां ! अगदीं तुझ्याजवळ ! नुस्तें हें कुंपण आहे मधें बघ ! पाकोळी, आतां मी अगदीं एकटा पोरका आहें ग ! तुला माहीतच आहे – माझा जुळा भाऊ – प्रदीप आपल्याबरोबर कॉलेजांत होता ? – मेला ! कलकत्त्याच्या बॉबहल्ल्यांत चेंगरला ! मी खूप खटपट केली वांचवायचो, पण काय ? मी आतां एकटाच उरलों ! डॉ. बिंदुमाधवकाकांचा मी मदतनीस आहें ! हो ! शास्त्रीय शोध लावतों आहें मी ! विटामीन, ग्रंथीरस, हार्मोनियम्......जाऊं दे तें — ! पाकोळी ! माझ्या फुला ! फुलपांखरा ! माझें तुझ्यावर कित्ती कित्ती प्रेम आहे म्हणून सांगूं !

[ डोळे मिटून हात पसरून कुंपणावरून
तोंड पुढें वाकवून उभा राहातो. ]

माझ्याशीं लग्न करशील का पाकोळी ? प्रदीप मेला, मालवला आतां ! पाकोळी, पाकोळी !

माझ्या फुलपांखरा, नाजूक, हलकेंफुलकें चुंबन घे ग किंवा दे ग जरा —

**पाकोळी :** चुंबन ? बजरंगा, तुला चुंबन हवें होय ? लाडक्या ससाण्या ! काजूला मुका हवा आणि तुला हवा चावा ! छान जुळलें ! घेच तर ! तयार ? एक दोन — चावा ! हा हा हा हा !

[ काजूच्या नाकाशीं पाकोळी एकदम ससाण्याची चोंच धरते.
काजू किंचाळून हातांत नाक धरतो व मागे सरकतो. ]

**काजू :** पाकोळी ! पाकोळी ! कसे पाषाणाचें — संगमरवरी काळीज आहे ग तुझें ! सुंदर स्त्रिया अशा निष्ठुर असतात तरी कशा ? माझें तुझ्यावर तरी सुद्धा प्रेम आहे ग पाकोळी ! माझी जूलियेट ! माझी शकुंतला ! . . .माझें सर्वस्व, बंगले आणि वाडे — मोटारी आणि घोडे — सगळें कांहीं तुझेंच आहे. पाकोळी, माझा असा तिरस्कार करूं नकोस ! मला माहीत आहे ! मी ठेंगू , कुरूप आहें, पण माझे हृदय निष्पाप, निर्मळ, शरदऋतूंतल्या तळ्याप्रमाणें तुडुंब भरून ओसंडतें आहे ! माझी प्रीति...विस्तार पावणाऱ्या विश्वासारखी दिवसेंदिवस वाढतें आहे ! आणि पाकोळी तूं ? तूं ! तूं साबणाच्या फुग्यावरील बदलत्या इंद्रधनुष्यी रंगछटांप्रमाणें मनोहर — अगदीं माझी स्वप्नसुंदरी मूर्तिमंत सजीव उभी आहेस. पाकोळी ! प्रदीपनें आणि या काजव्यानें, कॉलेजांत असतांना तुझ्यावर प्रेम केलें. प्रदीप — मदनाचा पुतळा — प्रदीप भस्म झाला आणि मी — त्याचा जुळा कुरूप भाऊ जिवंत राहिलों. ...तुझ्यासाठीं जगलों पाकोळी ! माझें तुझ्यावर प्रेम आहे पाकोळी ! प्रदीप मेला आतां !

**पाकोळी :** मेल्या, तूं कां नाहीं मेलास त्याच्या वांटचा ! तुझी गोष्ट सगळी बनावट खोटी आहे. मी प्रदीपशीं लग्न करणार आहें. केव्हां ना केव्हां तरी येऊन तो मला भेटेलच. दाखवूं नकोस मला तुझें काळें तोंड आणि रक्तबंबाळ नाकाड ! कॉलेजांत असतांना माझ्यामागें लागलास आणि अजून माझा पिच्छा सोडीत

नाहींस ! द्वाड मेला. म्हणे प्रेम ! मी तुझ्यावर प्रेम करूं ! I hate you, I HATE you, I HATE YOU !

[ रागानें पाय आपटीत पाकोळी निघून जाते. ]

[ वज्राघात झाल्याप्रमाणें सुन्न मनानें हळुहळू पावलें टाकीत काजू बाजूच्या दगडावर जाऊन बसतो. मंद आर्त संगीत वाजूं लागतें. उजेड मंद होत जातो. ]

**काजू :** हाय रे दैवा ! माझ्या आशा–आकांक्षांच्या ठिकऱ्या ठिकऱ्या झाल्या. काय झालें हें ! आयुष्याची माती झाली ! कसलें विफल जिणें हें ! प्रदीपवर सगळ्यांनीं प्रेम करायला धावावें आणि प्रदीपला कुणाचीही पर्वा नव्हती. हो हो ! मी त्याचा जुळा भाऊ ! मला त्याच्या अंतरंगाचा पुरा ठाव लागला होता. अः हः, कसला हा प्रेमाचा त्रिकोण ! प्रदीपला कोणीच नको होतें. पाकोळीला प्रदीप आणि मला पाकोळी हवी होती ! आणि काय आश्चर्य आहे पाहा ! ही नेत्रा म्हणे माझ्यावर प्रेम करीत होती आणि अजूनही करते ! माझ्यावर – माझ्या या माकडतोंडावर ! पण मी कसें प्रेम करूं तिच्यावर ? जें सुंदर नाहीं त्यावर कसे जडेल प्रेम माझे ? तिचें तरी माझ्यासारख्या कुरूप माणसावर कसे प्रेम जडणार, कसे टिकणार ? शेले ! शेले ! अरे, प्रीति ही काय चीज आहे रे ? कशावर आणि कुणावर माझें खरेंखुरें प्रेम आहे ? पाकोळी का नेत्रा ? नेत्रा का पाकोळी ? शेलेप्रमाणें मी सौंदर्याचा उपासक आहें. सौंदर्यानें मी आंधळा झालों आहें का ? पण सुंदर पाकोळी किती पाषाणहृदयी आहे ! काय करूं, कसें करूं ? माझा नुस्ता गोंधळ झाला आहे ! माझें पूर्वीचें जीवन, तीं स्मृतिचित्रे, माझ्या डोळ्यांपुढून सरकत आहेत. डोकें भणभणायला लागलें ! देवा रे ! –

[ काजूचें स्वगत भाषण संपण्याच्या सुमारास पडद्यावर अंधार होतो. काजूचें पात्र उठून जातें. मंद संगीत चालू असतें. ]

## झोत ३

[ प्रकाश तेजस्वी होतो. संगीत थांबतें. ]

**सूत्रधार :** याप्रमाणें काजू विचार करीत बसला असतां त्याच्या मनापुढें कॉलेजांतल्या शेवटच्या दिवसाचें चित्र उभें राहिलें—

[ कॉलेजचें चित्र. नंतर लागलीच ग्रंथालयापुढच्या पायऱ्यांचें चित्र. चित्र दाखवून झाल्यावर पुन्हा पांढरा प्रकाश. ]

कॉलेजच्या ग्रंथालयासमोरील पायऱ्यांजवळ काजू पुस्तक वाचण्यांत गुंग झाला होता. येणारीं जाणारीं मुलें व मुली सुद्धा त्याची टिंगल करीत होत्या. कागदाचे बोळे आणि विमानें फेकीत होत्या. पण काजूचें त्यांच्याकडे लक्षच नव्हतें. कांहीं वेळानें आठवल्यासारखें करून काजूनें खिशांतून एक चिटोरें बाहेर काढलें आणि तो कविता—ड्यूएट—गुणगुणूं लागला. मुलेंमुली गोळा झाल्या. एकीकडून प्रदीप, दुसऱ्या बाजूनें पाकोळी आणि मागून हलक्या पावलांनीं नेत्रा आली. सर्वजण गाणें ऐकूं लागले.

[ माईकवर एक गायक गाणें म्हणतो. काजू हातवारे करतो. ]

"मैं हूं नदी, तुम् जीवन हो
बादल मैं, तुम् बिजली हो !

कंटक मैं, तुम् हरियल मखमल
मैं कव्वा, तुम् मनहर कोयल

मैं हूं काजल, दीपज्योत तुम्
जुगनू मैं, तुम् तितली हो !

मैं हूं नदी, तुम् जीवन हो–
मैं हूं नदी, तुम् जीवन हो !

[ गाणें संपतांच एकटी नेत्रा टाळ्या वाजविते.
बाकीचे सर्व खिदळतात, हुर्रेवडी करतात. ]

**सूत्रधार :** सगळ्यांच्या हसण्याचा भर ओसरल्यावर प्रदीप पुढें जाऊन चेष्टेच्या सुरांत म्हणाला,

" काजू बेव्या, काय विनोदी कविता आहे ! आण, मी गातों ती ! मी माझ्या प्रियेबरोबर म्हणणार आहें हें ड्यूएट ! पोरींनो, कोण म्हणतें माझ्याबरोबर ! हात वर करा ! "

काय मजा पाहा ! सगळ्यांनीं आपले हात वर केले ! पाकोळी ठुमकत मुरडत प्रदीपजवळ जाऊन लाडिकपणानें म्हणाली,

" प्रदीप, आपण दोघें गाऊं या ! माझें नांव पाकोळी ! मी तितलीच आहें ! "

आतां मात्र नेत्राच्यानें दम धरवला नाहीं ! त्वेषानें प्रदीपच्या हातांतला कागद हिसकावून ती म्हणाली,

" नाहीं, प्रदीप, तुमच्या गाण्यानें तें गाणें विटाळवूं नका ! कविराजानें कवित लिहिली, त्यांनाच ती पुरती म्हणूं दे ! जिच्यावर, जिच्यासाठीं लिहिली, तीच त्यांच्याबरोबर गाणें म्हणेल ! काजू, तोंड उघडून सांग आतां धीरानें. हीच वेळ आहे. तुझ्याबरोबर कोणी गावें असें वाटतें तुला ? "

आणि काजू भीत भीत म्हणाला,

" माझ्याबरोबर – जुगनूबरोबर – पाकोळी हवी गायला ! "

झालें ! सगळे पुन्हा टिंगल करूं लागले. हुर्योनीं मैदान दणाणून गेलें. काजूच्या मस्तकांत घण पडूं लागले. प्रेमानें, अपमानानें तो वेडा झाला. मनांत म्हणाला,

‘ मी या सगळ्यांपेक्षां, प्रदीपपेक्षांही श्रेष्ठ आहें. दाखवतोंच त्यांना ! मी वाटेल तिच्यावर कविता लिहीन. कुणाची डर आहे मला ? मी मनास येईल त्या पोरीचें चुंबन घेईन ! .......... ’

बेभान होऊन तो मागें वळला आणि नेत्राजवळ गेला आणि चुंबनासाठी त्यानें तोंड जवळ नेलें ...

तों फाड्दिशीं नेत्रानें त्याच्या तोंडांत लगावली...गाल चोळीत काजू मागें सरून भानावर आला. पुन्हा हशाचा कल्लोळ उठला आणि एकदम शांत झालें. बाजूनें जात असलेल्या मुख्याध्यापकांनीं ही सर्व घटना पाहिली होती. मुख्याध्यापकांनीं काजूला कॉलेजांतून हाकून दिलें ! ज्या कॉलेजांतून बहुमानानें बाहेर पडावें, विद्याविभूषित होऊन सन्मानानें मिरवावें, त्या कॉलेजांतून बेअब्रू, अपमान, सोशीत जाणें भाग पडलें. धिक्कार असो अशा जिण्याला.........

[ प्रकाश मंद होत अंधार पडतो. ]

## झोत ४

**सूत्रधार :** [ अंधारांतच बोलतो. ] या पुढचीं अनेक स्मृतिचित्रें काजूच्या मनापुढून सरकलीं. उद्वेगाच्या भरांत काजू गांवोगांव भटकला. बापानें घरीं येऊं दिलें नाहीं. बाप मेल्यावर सगळी संपत्ति दोघा भावांच्या मालकीची झाली; तरी फुकट ऐतखाऊ जेवण काजूला आवडेना. बापाच्या चितगांवमधील ऑफिसांत काजू दिवसरात्र काम करी.

[ प्रकाश हळुहळू तेजस्वी होतो. ]

काजू टेबलाशीं बसून टाइपरायटरवर खटखट करी आणि प्रदीप आरामखुर्चीवर पडून सिगारेट ओढी, सोडा लेमन पिई, कादंबऱ्या वाची! पाहिलेंत! डोक्यावर A. R. P. चें पोलादी शिरस्त्राण घालून काजू सारखा सज्ज आहे. जपानी विमानांतून बॉबहल्ले होत आहेत ना आजकाल?

अर्रर्र! तो पाहा भोंगा वाजूं लागला, शिट्या ऐकूं येऊं लागल्या; लोकांचा गोंगाट, किंकाळ्या, पडझड, धडाड् धडाड् आवाज ऐकूं येऊं लागला. काजू उठून प्रदीपला खुर्चीवरून उठवतो आहे! अरे अरे अरे!

[ अंधार पडतो. आवाज सुरूच आहेत ]

छप्पर कोसळलें वाटतें, सापडले कीं काय दोघेजण या मातीविटांच्या ढिगाऱ्यांत ...

[ आवाज हलके हलके शांत होतो. ]

[ उजेड पडल्यावर काजू बाजूच्या दगडावर हातांत डोकें धरून बसलेला दिसतो. बागेंतील कुंपण. तोच झोत २ मधील देखावा ]

**काजू :** प्रदीप गेला आणि मी एकटा राहिलों! डॉक्टरकाकांनीं बोलावलें म्हणून इथें आलों! कशाला आलों मी? पाकोळीला मी नको आहें! तिला माझें प्रेम, माझे हृदय, भावना, अक्कल, मेंदू, आत्मा कांहीं कांहीं नको! तिला सुंदर कातडी, मांसल, पुष्ट, पीळदार देह पाहिजे!

कां असा फरक पडावा! आम्ही जुळे जुळे भाऊ होतों! मग प्रदीप मदनाचा पुतळा कां व्हावा आणि मी असा ठेंगू, बुटका, कुरूप, कां, कां! कां! कां?

[ डॉक्टर बिंदुमाधव हातांत विजेचा टॉर्च घेऊन शोधीत येतात. ]

**डॉक्टर बिंदुमाधव :** काजू! काजव्या! कुठें आहेस तूं? अंधारांत रे काय करतोस? वेड्या! किती मोठ्यानें आपल्याशींच बोलत होतास? सगळा शब्द न् शब्द ऐकला मीं! खुळ्या! कां म्हणून विचारतोस! साऱ्या जगाचा हा प्रश्न आहे! पण मी उत्तर देतों. याचें सगळें मूळ कारण ग्रंथि! तुझ्या ग्रंथींतून पुरेसा रस बाहेर पडला नाहीं, म्हणून तुझा शरीरविकास झाला नाहीं, समजलें? बोल! तुला प्रदीपसारखें सुंदर व्हायचें आहे का? सारखें? छे! छे! अगदीं प्रदीपच दुसरा! जसा कांहीं प्रदीप अज्ञाताच्या कुंपणावरून उडी मारून आला आहे! बोल, धोका पत्करायला तयार आहेस तूं? आहे छाती? आहे कबूल?

**काजू :** ऑ ऽ? काय? हो! कबूल! अगदीं कबूल. तयार आहें मी. धोका! आतां कसला धोका उरला आहे आणखी? सगळें गमावून बसलों आहे मी! मिळालें तर श्रेयच मिळेल! काजूचा अवतार संपेल. मी प्रदीप होईन...जसा कांहीं अज्ञाताच्या कुंपणावरून...कुंपणावरून...पलीकडे......पाकोळी! माझी पाकोळी–पाकोळी आतां माझी होणार...झपूर्झा गडे झपूर्झा......

**डॉक्टर बिंदुमाधव :** पुन्हा झपूर्झा? सांगितलें होतें कीं नाहीं तुला? त्या नॉनसेन्स, अर्थशून्य कवितेनें माझ्या कर्णनसांचा दाह होतो म्हणून...तोंड आटप!

खबरदार ! पुन्हा झपूर्झा म्हणशील तर ! झपूर्झा, हं : ! चल माझ्याबरोबर प्रयोग-शाळेंत. उचल पाय. चल !

[ हळुहळू प्रकाश मंद होऊन अंधार पडतो. ]

[ अंधारांत मंद आर्त संगीत वाजू लागतें. ]

[ संगीत संपतें. प्रकाश तेजस्वी होऊन डॉक्टरांची प्रयोगशाळा दिसूं लागते. ]

## झोत ५

[ डॉक्टर बिदुमाधवांची प्रयोगशाळा. एका बाजूच्या टेबलावर बाटल्या, बरण्या, बर्नर, दिवे, अर्कपात्र आहे. एका बशींत इंजेक्शन टोंचण्याची सुई आहे. टेबलावर एक हातआरसा आहे. एका घडवंचीवर पिजऱ्यांत उंदीर किंवा गिनीपिग आहेत. एक आरामखुर्ची व तिच्या हातावर एक लांबरुंद कपडा ठेवलेला आहे. ]

[ काजू हळुहळू येतो. अंगावर शहारे आल्याप्रमाणें करून वाटेंतला गिनीपिगचा पिंजरा बाजूला ठेवतो. टेबलावरील एक एक वस्तु हाताळतो ; आरशांत तोंड पाहातो. ' आवडत नाहीं रूप ', असा आविर्भाव करतो. ]

**डॉक्टर बिंदुमाधव :** [ प्रवेश करून, अंगांत एप्रन व खिशांत, गळ्यांत स्टेथॉस्कोप ] काय काजवेराव ! घाबरून लुकलुकायला नाहीं ना लागलास ? शाबास बेटा ! माझी सगळी तयारी जय्यत आहे. आतांपर्यंत उंदीर, बेडूक, मांजर, कुत्रें, कोंबडीं आणि शेळ्यामेंढ्या यांवर प्रयोग केले. आतां मानवावर ! तूं धोका पत्करायला तयार आहेस ; मी मानवजातीचें कोटकल्याण करणार आहें. [ टेबलाकडे जाऊन मिश्रणें करतां करतां ] आतांपर्यंत अनेक प्रयोग अनेकांनी केले. संजीवनी उपयोगी पडते **मेलेल्या** मढ्याला ! अमृत अमर करतें आणि मरणाचें सुख नाहींसें होतें. परकायाप्रवेश करून स्वतःच्या शरीराला मुकावें लागतें. तो कायाकल्प **म्हाताऱ्याला** तरुण करतो म्हणे ! पण माझा कायाकल्प – अनेक ग्रंथींचा अर्क – वानराचा नर आणि नराचा नारायण करील. तुला रे काय ? शरीराची खुंटलेली वाढ एकदम करून नुस्तें जुळ्या भावाप्रमाणें व्हायचें आहे !

हं, झालें अर्काचें मिश्रण तयार ! त्यांत काय कठीण ! थांब. आधीं तुझें हृदय तपासूं दे ! ..... ठीक ! उत्तम ! [ सुई भरतां भरतां ] आतां तुला अर्क टोंचतों. आणि मग रे काय ! – तुझें अंतरंग, मन, अंतःकरण, भावना, विचार, मेंदू, वाटलें तर तुझा आत्मा सुद्धा ( हूंः ) तुझा तुलाच राहून – सगळ्या जगाला तूं प्रदीप होशील. बिशाद आहे तुला कोणी ओळखील ? स्वस्थ पड. शांत हो. Relax ! हं, तुझा हात......

[ डॉक्टर इंजेक्शन देतात. काजू दांत आवळून धरतो. कमरेपासून पुढें झुकतो व पुन्हा मागें पडतो. डॉक्टर त्याच्याकडे स्थिर नजरेनें पाहून हळुहळू त्याच्या सर्वांगावर कापड घालून, फक्त तोंड उघडे ठेवून झाकतात. टेबलाकडे जाऊन सुई ठेवतां ठेवतां ... ]

फार वेळ लागायचा नाहीं परिणाम व्हायला. पण हा परिणाम कायमचा होईल का ? होईल, कां नाहीं होणार ? पण कसलाही मानसिक धक्का बसतां कामा नये.

[ डॉक्टर मागे वळून पाहून हलके हलके बाहेर जातात. याच वेळीं मंद, आर्त, विस्मयजनक बदलाबदलाचें संगीत सुरू होतें. ]

[ प्रकाश **दोनदा** मंद तीव्र होतो. मंद होऊन अंधार पडतो. अंधार असतांनाच काजू उठून जातो व त्याच्या जागेवर प्रदीप निजतो. आतां उजेड मंद, तेजस्वी – मंद, तेजस्वी – मंद, अंधार होतो.मग **एकदम एकाच वेळीं** लख्ख प्रकाश, संगीत थांबतें, तासघंटा वाजते. ]

[ काजू म्हणजे आतां प्रदीप जागा होतो. पांघरूण काढून उठून बसतो. डोळे चोळून आश्चर्यानें आपले हात, बोटें, दंड, छाती चाचपतो. उभा राहून ऐटीनें छाती काढून चालतो. टेबलापाशीं जाऊन आरशांत पाहातो. आरसा खालीं फेकून — पुन्हा थरथरत्या हातांनीं उचलून, ]

**काजू-प्रदीप :** कोण तूं ? तूं प्रदीप ? परत आलास तूं ! मला भीति दाखवायला, माझी टिंगल करायला आलास ! खरेंच का तूं अज्ञाताच्या कुंपणावरून उडी मारून आलास ? अःह् ह् ! ! मी **काजू** आहें ! काजूच आहें मी. शरीरानें प्रदीप पण खरा काजूच ! इंजेक्शन ! मिरॅकल ! " मै हुं नदी तुम् "......

शू: शू: विसरूं नकोस काजू! मी प्रदीप आहें. काजूचा अवतार संपला. कुंपणाखालून तो भुईत, मातींत गेला. मी उडी मारली कुंपणावरून. कुंपण...कुंपणापलीकडे......अहाहा, पाकोळी, माझी पाकोळी, तूं आतां माझी !...माझी !... काजूची ! ... शूऽ....शू: शू: विसरूं नकोस काजू ! माझी...माझी !

[ काजू झपाट्यानें निघून जातो. ]

[ अंधार ]

## झोत ६

[ बागेमधील कुंपण. बाजूला दगड. ]

**सूत्रधार :** [ उजेड तेजस्वी होत असतां ] आपल्या पाकोळीला भेटण्यासाठीं अधीर झालेला काजू – म्हणजे आतां प्रदीपसारखें शरीर झालेला काजू, आनंदानें नाचत बागेंत येऊन, कुंपणाच्या फटींतून पाहूं लागला. कुणीतरी कोकराशीं खेळत बसलें आहे. काजूला वाटलें कीं पाकोळीच आहे. त्यानें एक फूल तोडून तें कुंपणावरून नेत्राच्या — नेत्रा होती ती — नेत्राच्या अंगावर फेकलें आणि खालीं बसून तो वाट पाहात राहिला. बिचारी नेत्रा ! तिनें तें फूल उचलून वास घेतला. अरे रे ! किती दुःखी कष्टी आहे बिचारी ! —

**नेत्रा :** अहाहा ! किती सुगंधी फूल आहे हें ! काजूच्या प्रेमळ स्पर्शानें पवित्र झालेल्या ह्या फुलाला प्रीतीचा सुगंध येतो आहे ! पण वेडे मुली, नेत्रा, हें फूल बाई तुझ्यासाठीं नाहीं ग ! काजू ! काजू ! तुझें गोड प्रेम, तुझ्या कोमल भावना अशा कां वाऱ्यावर फेकून देतोस रे ! पाकोळीला कुठें आहे त्यांची गरज ! थांब फुला, तुझें एकवार चुंबन घेतें आणि जा बाबा परत ! काजूच्या ओठांना जाऊन बिलग ! तेवढेंच माझ्या जिवाला समाधान उरलें आहे !

[ उभी राहून फूल फेकणार, इतक्यांत काजू–प्रदीप उभा राहातो.
हिरमुसला होऊन मागें सरतो, नेत्रा दचकते व मागें वाकून ]

कोण प्रदीप ? तुम्ही कसे इथें ? तुम्ही मेलां नव्हतात तर ? मग काजू कुठें आहे ? माझा काजू कुठें आहे ? तुम्ही प्रदीप ! खरेंच, जिवंत प्रदीप !

**काजू :** [ तिरस्कारानें हसत ] नेत्रा, आंधळे ! डोळे फाडून बघ ! अशी बावचळूं नकोस ! वेडे ! मी खरा का...नाहीं नाहीं ! मी खरा प्रदीप आहें ! जिवंत हाडामासांचा **प्रदीप** ! कां ? अशी आश्चर्यानें डोळे ताणून काय पाहातेस ? खोटें वाटतें ? माझा हात धरून पाहा ! स्वप्न वाटतें तुला ? चिमटा घेऊं ? हं हं हं ! मी मेलों नाहीं, भूत नाहीं. जिवंत आहें मी ! [ ऐनवेळीं गोष्ट जुळवीत ] त्या गाढवाला वाटलें कीं मी मेलों आणि तो काजू पळून गेला. हो, पळून गेला. मला लोकांनीं उचलून नेलें. थोडीशी दुखापतही...अॅ ? मानसिक....विस्मरण ? हो. विस्मरण झालें होतें. मग ? मग काय केलें बरें ? काय केलं...! हो ! विटामीन, हार्मोनियमचें इंजेक्शन...आठवत नाहीं. पाहातेस काय अशी ? मी प्रदीप आहें ! प्रदीपच आहें मी ! अन् पाकोळीशीं लग्न लावणार आहें आतां. तिला प्रदीपशीं लग्न करायचें होतें. **मी** प्रदीप आहें आतां. माझी पाकोळी. झपूर्झा...गडे झपूर...

[ नेत्रा जवळ येऊन त्याच्या डोळ्याकडे निरखून पाहाते, टक लावून पण मान हलवते. ]

नेत्रा ! अशी टक लावून काय पाहातेस ? अशी मान काय हलवतेस नंदीबैलासारखी ! मी प्रदीपच आहें ! खोटें वाटतें तुला ? मी काजू आहें असे वाटतें तुला ! पाहा, माझे हात पाय, छाती, दंड, तोंड पाहा ! काजूसारखा दिसतों मी ? मी ठेंगू कुरूप आहें का **आतां** ?

नाहीं, नाहीं, नेत्रा ! मी प्रदीप आहें प्रदीप ! मूर्ख आहेस तूं नेत्रा ! खुळी आहेस खुळी तूं !

**नेत्रा : मी** खुळी ? तूं खुळा आहेस **काजूऽऽ** ! असें सुंदर रूप धारण करून **लोकांच्या** डोळ्यांत धूळ टाक काजू ! तूं **मला** फसविणार काजू ! तुला काय वाटलें, माझ्या डोळयांच्या खांचा झाल्यात होय ? मी आंधळ्यांच्या दवाखान्यांतली सिस्टर आहें म्हटलं ! तुझ्या डोळ्यांतून आंत आंत शिरून मला तुझ्या अंतःकरणाचा पुरा ठाव लागला आहे ! काजू, मूर्ख माणसा ! इतक्या कविता वाचतोस, खरडतोस पण खरें जिवंत काव्य जगतां येत नाहीं तुला ! कालाच्या अंतापर्यंत प्रियाची वाट पाहाणाऱ्या जिवांची अद्भुत कहाणी गातोस आणि सुंदर छबकड्यांच्या मागें गोंडा घोळतोस. कुणाला उंची वस्त्रें आवडतात म्हणून फाटके कपडे टाकून नवीन उंची

कपडे घातलेस. पण कपडे आवडतात; तूं आवडत नाहींस, हें कडू सत्य तुला आवडेल का काजू !

काजू ! खरें सांग ! लपवूं नकोस ! डॉक्टरकाकांनीं तुला इंजेक्शन दिलें की नाहीं ? दचकलास कां ? होय ना ? हाः हाः हाः ! अरे बाबा ! डॉक्टरांनीं माझ्या कोकराला टोंचून त्याचा मस्त मेंढा बनवला, आणि तुझा – मेषपात्राचा मदनाचा पुतळा केला, हाः हाः हाः ! काय रे काजू ? कुठें आहे तो मेंढा ? बघ ! त्याचें परत गोजिरवाणें बछडें कोकरूं झालें आहे पुन्हा ! बघ, नीट बघ ! हाः हाः हाः खरें वाटत नाहीं तुला, माझ्या कोंकरा ! तुला खरें कसें आणि केव्हां वाटणार आतां ? तुझे डोळे उघडायला एकादें जलाल इंजेक्शन किंवा धक्काच बसला पाहिजे.

काय मौज आहे ! काजू ! तूं? तूं प्रदीप ! प्रदीप ! प्रदीप ! !

[ पाकोळी धापा टाकीत टाकीत धावत येते. नेत्रा बाजूला सरकून उभी राहाते. ]

**पाकोळी :** काय म्हणालीस तूं नेत्रा ? प्रदीप, प्रदीप ! माझा प्रदीप ! कुठें आहे प्रदीप ? कसा येईल तो ?......

अहाहा ! प्रदीप, माझा प्रदीप ! माझा रोमियो, मदनाचा पुतळा तो ! मी स्वप्नांत तर नाहीं ना ? प्रदीप, खरेंच तूं परत आलास ? अज्ञाताच्या कुंपणावरून उडी मारून तूं आंत आलास ? प्रदीप, खरेंच प्रदीप आहेस तूं ?

**काजू – प्रदीप :** होय, मी प्रदीप आहें ! कुंपणावरून उडी मारून आलों. हाडां-मांसाचा जिवंत प्रदीप आहें मी ! त्या ग्रीक पुराणांतल्या फिनिक्स पक्ष्याप्रमाणें राखेंतून परत आलों. कचाप्रमाणें कालाचें पोट फाडून आलों. स्वर्गांत तुझ्यासारखी अप्सरा नाहीं म्हणून...हंः ! उगीच चिकित्सा कशाला ? तुला प्रदीप हवा होता ना ? हा प्रदीप तुझ्यापुढें उभा आहे ! पाकोळी, माझी पाकोळी ! कुंपणाच्या या फटींतून अशी अलीकडे येऊन माझ्याजवळ – अगदीं जवळ उभी राहा !...... अस्से ! किती दिवस मनांत होतें. आज भाग्याचा क्षण आला ! पाकोळी, अगदीं खरें सांग ! माझ्याशीं लग्न करशील तूं ?

**पाकोळी :** अय्या ! आज असा प्रश्नसा विचारतां ? माझ्या तोंडून अगदीं वदवून घ्यायचें आहे वाटतें ? मी कांहीं लाजायची नाहीं परकऱ्या पोरीसारखी !

हो करीन, करीन लग्न – आत्तां सुद्धा! करीन तर प्रदीपशींच लग्न करीन! अशा राजबिंड्याशीं कोण करणार नाहीं? या पाकोळीचें लग्न प्रदीपशींच!

**काजू – प्रदीप :** ॲं? प्रदीपशींच! लग्न करशील माझ्याशीं? खरेंच पाकोळी! करशील लग्न माझ्याशीं? ...मी खरा काजू असलों तरी?

**पाकोळी :** [ मागें सरकून ] आई ग! ही काय असली भलती सलती घाणेरडी थट्टा करतां हो तुम्ही प्रदीप! तुम्ही आणि काजू? इश्श! आम्ही नाहीं जा तुमच्याशीं बोलत!

**काजू – प्रदीप :** अशी रागावूं नकोस पाकोळी. थट्टा नाहीं ही. बरें! आपण घटकाभर गमतीनें खेळूं या! समज, मी अगदीं खराखरा काजू आहें! अगदीं अंतर्यामीं काजूचें मन, भावना, कल्पना, आत्मा आणि वर मात्र प्रदीपसारखें शरीर! चालेल तुला असा मी खराखुरा असलों तर?

**पाकोळी :** [ अंगावर शहारे येऊन ] प्रदीप, नका हो अशी जीवघेणी चेष्टा करूं! मला वीट आला आहे काजूचा, तिरस्कार! [ रडकुंडीला येऊन ] I hate him. कांहीं आवडत नाहीं मला त्याचें! तो, त्याच्या त्या कविता, कांहीं कांहीं नको! मला **तूं** आवडतोस प्रदीप! "पतंग ज्योतिवर झडा घाली, मनि नाहीं त्याच्या खरखर"...प्रदीप! तूं अगदीं बदमाष, निर्बुद्ध असलास तरी मला चालेल. पण मदनासारखें, अपॉलोसारखें रूप काजूला मिळालें तरी मला तो नको. I hate him! I HATE him! I HATE HIM!!

[ काजू – प्रदीप हताश होऊन जड पावलांनीं चालत बाजूच्या दगडावर जाऊन बसतो. विस्मयजनक फेरबदलाचें संगीत पुन्हा सुरू होतें. ]

**काजू – प्रदीप :** तरी मला वाटतच होतें! संपलें नाटक! आटोपला कारभार! आतां मात्र मीच कुंपणावरून उडी मारून जाणार! माझ्या डोळ्यांत झणझणीत अंजन पडलें. पाकोळीचें माझ्यावर – खऱ्या माझ्यावर – मुळींच प्रेम नाहीं. अरेरे! काय प्रसंग हा! माझा जीव घाबरायला लागला. काय करूं, कसें करूं! कसें करूं!

[ काजू-**प्रदीप** हें सर्व बोलत असतां त्याची सावली **पूर्णपणें** झाकून पाकोळी उभी असते. तशीच राहून ती पुढचें भाषण म्हणते. ]

[ एवढ्या वेळांत प्रदीप उठून जातो व **काजू** त्याच्या जागीं हातांत डोकें धरून बसतो. ]

**पाकोळी :** प्रदीप, लाडक्या प्रदीप ! काय होतें आहे रे तुला असें ? काय झालें ? काय होतें आहे रे हें ! तूं लहान लहान व्हायला लागलास ! वाकून विद्रूप व्हायला लागलास ! हें घाणेरडें, भयंकर स्वप्न तर पाहात नाहीं ना मी ! आई आई ग ! प्रदीप, प्रदीप ! वर मान करून आपल्या लाडकीकडे पाहून एकदा हास ना, प्रदीप !

[ संगीत थांबतें. पाकोळी बाजूला सरकते. प्रदीपच्या ऐवजीं दगडावर काजू बसलेला दिसतो. ]

**पाकोळी :** [ आश्चर्यानें आणि संतापानें चढ्या आवाजांत ] आं ! काय प्रकार आहे हा ? काजू ! तूं ? बदमाष ! असे बेमालूम सोंग आणून मला फसवीत होतास काय ? डाकू, निर्लज्ज ! काय समजलास रे मला तूं ! हलकट, लुच्चा कुठला ! आधींच मला तुझा वीट आला होता. तोंड दाखवूं नकोस मला.

I hate you ! I HATE you ! I HATE YOU !!!

[ पाकोळी पाय आपटीत निघून जाते. नेत्रा कुंपणापलीकडेच पण जरा जवळ उभी राहाते. ]

**काजू :** फुकट ! फुकट श्रम घेतले ! फुकट फुकट जिवाला आशा लावली. इंजेक्शनचा कांहीं उपयोग झाला नाहीं ! बरें झालें, आतांच मी पुन्हा काजू झालों तें ! पाकोळीशीं लग्न झाल्यावर बदललों असतों तर जन्मभर I hate you, I hae you, I hate you ! अं हः हः ! पाकोळीला मी नको, माझे अंतरंग नको. तिला मांस पाहिजे ; माणसाचें मांस पाहिजे ! तिच्या त्या ससाण्यासारखें !

अरेरे ! आतां मी पुन्हा एकटाच राहिलों. माझ्यावर कोणी प्रेम करीत नाहीं. आतां मी कोणाबरोबर म्हणूं, " मै हूं नदी........ "

[ नेत्रा कुंपणाच्या फटींतून वाकून येऊन त्याच्या-
जवळ उभी राहून त्याच्या खांद्यावर हात ठेवते. ]

**नेत्रा :** काजू! जागा हो! तुझे घाणेरडें भयंकर स्वप्न विरून गेलें आतां! आजपर्यंत या वाईट स्वप्नाच्या नशेंत तुला खरें खोटें, चांगलें वाईट समजत नव्हतें. पाक्रोळीला कशाला दोष देतोस? तिचें प्रदीपवर खरेंखुरें प्रेम होतें. तुझ्यावर ती अळेंबळें कसें प्रेम करील? कसें रुचेल तुला तें फसवून केलेलें प्रेम? जागा हो काजू! हास माझ्याकडे पाहून!

"प्रेम कोणीही करीना, कां अशी फिर्याद खोटी!"

मी करतें ना तुझ्यावर प्रेम? आतां तुझे डोळे उघडले ना? तूं खरा कसा आहेस तें तुला आतां समजलें! तुझी स्वप्नसुंदरी तुझ्यासमोर ही उभी आहे बघ! बघ, माझ्या डोळ्यांकडे बघ! तुझ्या डोळ्यांतून मला तुझें मोहक, प्रेमळ अंतरंग स्पष्ट दिसतें आहे.

काजू! मी आंधळ्यांच्या दवाखान्यांतील सिस्टर! पण मीच आंधळी झालें आहें! माझ्या प्रेमचक्षूंना तूं मदनाचा पुतळाच दिसतोस. काजू! आपलें दोघांचें एकमेकांवर पहिल्यापासूनच प्रेम होतें; पण सौंदर्यानें दिपला होतास तूं!

काजू! काजव्या! कविराज खद्योत! कबूल करा बरें आतां! **माझ्यावरच** तूं ती कविता कॉलेजांत लिहिलीस, होय ना काजू! चल, आपण ती कविता—तें ड्यूएट दोघेजण बरोबर गाऊं; आणि ही गर्दी, ह्या छाया......सारें सारें मागें टाकूं आणि दूर दूर कुठेंतरी गात गात जाऊं! चल. धर माझा हात! आतां गा पाहूं माझ्याबरोबर!

ती : मैं हूं नदी, तुम् जीवन हो

तो : बादल मैं, तुम् बिजली हो
कंटक मैं, तुम् हरियल मखमल
मैं कव्वा, तुम् मनहर कोयल

ती : मै हूं काजल, दीपज्योत तुम्

तो : जुगनू मैं, तुम् तितली हो !!
मैं हूं नदी० —

तो : अमवस मैं, तुम् शरद चांदणी

ती : बारिष मैं, तुम् बसंत सुहानी
मैं छाया, तुम् तेज पिया हो !

तो : कुछ भी ना मैं, सब कुछ तुम् हो

ती-तो : मैं हूं नदी, तुम् जीवन हो !

[ एक गायिका व गायक ड्यूएटमधील 'तो – ती'चीं कडवीं म्हणतात. गाणें चालू असतांना प्रकाश मंद होतो. काजू व नेत्रा अभिनय करीत दिव्याकडे जातात. त्यामुळें छाया अंधुक मोठ्या होतात. गाण्याच्या शेवटीं अंधार पडतो. ]

प ड दा

# बोलती सावली

ह्या वेळेपर्यंत आपण पाहिलेल्या किंवा वाचलेल्या छायानाटकाचा हा प्रकार नवीन आहे असे मला वाटतें. निदान मराठी साहित्यांत आणि रंगभूमीवर ही प्रथमच येत आहे हें खास. छायानाटकाची कल्पना माझ्या मनांत कशी आली व तिचा कसकसा विकास झाला याची माहिती मीं साहित्य संघातर्फे प्रसिद्ध होणाऱ्या 'साहित्या 'च्या नाट्यमहोत्सव अंकांत दिली आहे.

अगदीं लहानपणापासून सावलीचा आणि माझा अगदीं निकटचा संबंध असला पाहिजे असे वाटते. सकाळसंध्याकाळ मोठी असणारी व दुपारीं पायांत घुटमळणारी स्वतःची सावली मला इतकी आवडे कीं तिनें माझी व मीं तिची पाठ अजूनपर्यंत सोडलेली नाहीं. झाडांच्या हलत्या सावल्या, डोंगराची विशाल सावली आणि ढगांच्या धावत्या सावल्या अजूनही माझें मन मोहित करतात. चांदण्यांत घरांच्या व झाडांच्या धूसर सावल्यांनीं माझ्या मनाला भीतियुक्त आनंद वाटला आहे आणि चांदण्यांत जमिनीवर पडलेल्या स्वतःच्या सावलीकडे अनिमिष नेत्रांनीं पाहून वर आभाळाकडे पाहिल्यावर स्वतःची विशाल छाया पसरलेली मीं पाहिलेली आहे.

कदाचित् याच भावनेमुळें शेक्सूपियरचें 'Come like shadows, so depart' (छायेप्रमाणें आम्ही येतों आणि जगांतून प्रयाण करतों) व बर्कचें 'What shadows we are and what shadows we pursue' (आपण छायाकृति असूनही कसल्या छायांच्या मागें धावतो आहोंत) हीं सुभाषितें माझें मन व्यथित करतात.

लहानपणीं मीं हाताचीं बोटें चाळवून ससा, हत्ती, माणूस नाचवले आहेत. कागदाचीं चित्रे कापून काड्यांवर चिकटवून पडद्यावर छाया पाडून मॅजिक लॅटनर्ची भूक भागवली आहे आणि स्वतःची सावली वेडीवाकडी नाचवून स्वतःची व बालप्रेक्षकांची फुकटची करमणूक केली आहे.

आपण कांहींतरी नवीन करतों असें त्या वेळीं भाबड्या मनाला वाटले पण रामायण-महाभारतांतील कथांच्या मूकछायारूप गोष्टी कागदाच्या व कातड्याच्या कापीव चित्रांच्या छाया पडद्यावर पाडून जावा-बाली बेटांत दाखवीत हें आतां समजलें.

भिंतीवर पडलेल्या माणसांच्या छाया रेखाटल्या पण अशीं छायाचित्रें काढण्याची कॅमेऱ्याच्या शोधापूर्वी एक फॅशनच होती. छायाचित्रें चित्रपटांतून आतां मधून मधून डोळेपालट म्हणून पाहावयास मिळतात.

छायानाटकाचा उपक्रम प्रथम कॉलेजच्या वार्षिक संमेलनांतून मूक हास्यप्रधान गोष्टी दाखविण्यांत करण्यांत आला. मीं लिहिलेल्या एका छायानाटकास सूत्रधाराच्या कथावर्णनाची जोड दिली. धावतें संविधानक, घटना, सर्व पात्रांचीं भाषणें माईकसमोर सूत्रधारानेंच बोलावीं असा तो एकखांबी तंबू होता. तरी पण त्याचें प्रेक्षकांकडून चांगलें स्वागत झालें.

रेडियोनाटक व मूकछायानाटक यांची एककालता ( synchronisation ) साधून प्रयोग करण्याची कल्पना मनांत येऊन Over the fence हें इंग्रजी संवादाचें स्वतः लिहिलेलें नाटक इस्माईल युसुफ कॉलेजच्या संमेलनांत १९ जानेवारी, १९४७ रोजीं दाखविण्यांत आलें.

बोलतें छायानाटक, बोलत्या सावल्या, बोलछाया, छायानाट्य हा प्रकार नाट्यवाङ्मयांत नवीन आहे असें कांहीं मित्रांना वाटलें व ' कुंपणावरून ' हें मराठी छायानाटक मीं लिहावें आणि मुंबई मराठी नाट्यमहोत्सवांत शक्य झाल्यास रंगभूमीवर प्रयोग करून प्रेक्षकांना हा नवीन प्रकार कितपत रुचतो आणि मानवतो याचा अंदाज घ्यावा अशी कल्पना निघाली. नाट्यमहोत्सवांत हें मराठी छायानाटक कांहीं मित्रांच्या सहकार्यानें प्रथम रंगभूमीवर येत आहे आणि पुस्तकरूपानें साहित्यिकांपुढें व वाचकांसमोर येत आहे.

रा. मामा वरेरकर म्हणतात त्याप्रमाणें छायानाटकाचें तंत्र अजून तयार व्हावयाचें आहे. छायानट, ध्वनिनट, नेपथ्यरचना, पार्श्वसंगीत, प्रकाशयोजना सर्वच कांहीं प्रयोगावस्थेंतील आहे. यापुढें कुशल नटांनीं आणि प्रतिभावान् लेखकांनीं आणि दूरदर्शी दिग्दर्शकांनीं ह्या नवीन सापडलेल्या साधनाचा विकास करून रंगभूमीला नटवावयाची आहे.

मूकपट व बोलपट, कळसूत्री बाहुल्या व नाटक, रेडियो व टेलिव्हिजन याचप्रमाणें ओल्या सफेद पडद्यावरील माणसांच्या अभिनय करणाऱ्या छाया आणि नभोवाणीवरील नाटकें यांच्या संमिश्रणानें हें छायानाटक बनलें आहे आणि त्यामुळेंच दोन्ही प्रकारांचे गुणदोष उतरून शिवाय आणखी त्यांत स्वतःचेंच

विशेष काय उत्पन्न झालें आहे हें नुसते सांगण्यांत स्वारस्य नाहीं. ते नटांना व प्रेक्षकांनाच समजेल.

अंधारांत ओल्या पांढऱ्या पडद्यावर छाया बोलून अभिनय करून आपल्या जीविताचें कोडें उकलतात. एक नवीन यक्षसृष्टि आपणासमोर उभी राहाते. अंधुक म्हणूनच रमणीय, उमरखय्यामच्या कंदिलाभोवतीं गिरगिरणाऱ्या सावल्यांप्रमाणें मायावी पण वास्तव जगाचें प्रतीक असा हा प्रकार बोलछाया, बोलत्या सावल्या, छायानाटक, कोणत्याही नांवानें रूढ होवो—कारण नांवांत काय आहे ?—हा प्रकार रसिकांस सादर करून व आजच सकाळीं छायारूप झालेल्या आमच्या शिकारी मांजरीस—चिंगीस हें छोटेखानी पुस्तक अर्पण करून मी माझा अंधारांतला आवाज थांबवतों आणि बोलती सावली पुन्हा अंधारांत नाहींशी करतों.

श्री. बा. रानडे

खार, २४ एप्रिल, १९४७

# ल लि त सा हि त्य

## का दं ब ऱ्या

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **डेक्कन कॉलेजांत,** पु. रा. लेले | ... | २ | ८ | ० |
| **उगवत्या सूर्याचा काळोख,** वि. वा. हडप | | ३ | ० | ० |
| **सुशिलेचा देव,** वा. म. जोशी | ... | २ | ८ | ० |
| **नवा नमुना,** वि. कृ. नेरूरकर | ... | २ | ० | ० |
| **नाकेबंदी,** र. ग. विद्वांस | ... | १ | ८ | ० |
| **द्वंद्व,** वि. वि. बोकील | ... | ४ | ० | ० |
| **स्वराज्याची घटना,** नाथमाधव | ... | | | |
| **पुसलेल्या रांगोळया,** सौ. शांताबाई नाशिककर | | ३ | ८ | ० |

## वि नो दी

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **गनिमी कावा,** भा. वि. नाडकर्णी [ कादंबरी ] | | ४ | ० | ० |
| **अण्णा,** बा. वा. फाटक [ व्यक्तिचित्र ] | ... | २ | ० | ० |
| **हरवलेलं तिकीट,** द. वि. गुप्ते [ कथासंग्रह ] | | १ | ८ | ० |
| **दीड शहाणे,** प्रो. वि. मा. दी. पटवर्धन ,, | | २ | ० | ० |
| **माझा विक्रम,** भा. रा. भागवत ,, | | २ | ८ | ० |

## ल घु क था

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **विसाव्याचे क्षण,** सौ. मालतीबाई दांडेकर | | १ | ४ | ० |
| **फोटोंचं लग्न,** वि. कृ. नेरूरकर | ... | १ | ८ | ० |
| **प्रस्थान,** प्रा. वामन चोरघडे | ... | २ | ० | ० |
| **महाश्वेता व इतर गोष्टी,** र. गो. सरदेसाई | | १ | ८ | ० |
| **कृष्णकमळीची वेल,** प्रभाकर पाध्ये | ... | १ | ८ | ० |
| **ठकीचें लग्न,** चं. वि. बावडेकर | ... | २ | ० | ० |
| **आठवा सर्ग,** स. अ. शुक्ल | ... | २ | ८ | ० |
| **आश्रमकन्यका,** वारूबाई शेवडे | ... | २ | ८ | ० |
| **पहिला पाऊस,** पु. भा. भावे | .... | २ | ४ | ० |

## आ त्म च रि त्र, आ ठ व णी

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **गडकऱ्यांच्या आठवणी,** प्र. सी. गडकरी | | १ | ० | ० |
| **माझें पुराण,** आनंदीबाई कर्वे | ... | १ | ४ | ० |
| **स्मृतिचित्रें,** भाग १ ला, लक्ष्मीबाई टिळक | ... | २ | ८ | ० |

## ल घु नि बं ध व ले ख

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **उघडे लिफाफे,** ना. मा. संत | ... | १ | ८ | ० |
| **वनशोभा,** आचार्य काका कालेलकर | ... | ० | ५ | ० |
| **कृत्तिका,** पुरुषोत्तम मंगेश लाड | ... | १ | ८ | ० |
| **गारगोट्या,** दि. ल. देवधर | ... | १ | ० | ० |
| **सवडीचे क्षण,** प्रो. भ. श्री. पंडित | ... | १ | ४ | ० |
| **रक्त आणि अश्रु,** पु. भा. भावे | ... | १ | ८ | ० |
| **कांहीं माणसें,** स. वि. देशपांडे | ... | १ | ४ | ० |

## का व्य सं ग्र ह

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **मधुपर्क,** पुरुषोत्तम मंगेश लाड | ... | १ | ० | ० |
| **मानसमेघ,** गिरीश | ... | १ | ८ | ० |
| **यशोगिरी,** यशवंत | ... | १ | ८ | ० |
| **उज्ज्वला,** कृ. ब. निकुम्ब | ... | १ | ४ | ० |
| **सावरकरांची कविता** | ... | २ | ० | ० |
| **ओजस्विनी,** यशवंत | ... | १ | ८ | ० |
| **रुपेरी रसधारा,** स. अ. शुक्ल | ... | १ | ८ | ० |
| **चंदेरी लहरी,** शांताराम आठवले | ... | २ | ० | ० |